ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यात
सहाय्य करण्यासाठी व सल्ला
देण्यासाठी राज्यशासनाने
निवडलेल्या संस्था

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक : २१५६/फाईल/डीआयटी/२०११**
**सामान्य प्रशासन विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक १ जून, २०११**

राज्य शासनाचे विविध विभाग त्यांच्या नियंत्रणा खालील कार्यालये/महामंडळे/स्वायत्त संस्था इत्यादींना ई-गव्हर्नन्स प्रक्ल्प राबविण्यात सहाय्य करण्यासाठी व सल्ला देण्यासाठी राज्यशासनाकडून काही संस्थानां तीन वर्षाच्या कालावधी करिता सल्लागार संस्था म्हणून निवडण्यात (Empanelled) आलेल्या आहेत. सदर संस्थांची नांवे खालील प्रमाणे:-

१) मे. ॲक्सेंचर सर्व्हीसेस प्रा.लि.
२) मे. इॲन्डवाय प्रा.लि.
३) मे. पिडब्ल्युसी प्रा.लि.

टिप:- मे.केपीएमजी व मे. डेलॉईट इंडीया प्रा.लि. या संस्थांची निवडप्रक्रीया चालु आहे. सदर निवड प्रक्रीया पुर्ण झाल्यावर प्रसिध्द करण्यात येईल.

शासनाच्या विविध विभागांना त्यांच्या नियंत्रणा खालील कार्यालये /महामंडळे / स्वायत्त संस्था इत्यादींना निवड केलेल्या संस्थामधुन सल्लागाराची नियुक्ती करता येईल,सल्लागाराची वर्गवारी, शैक्षणिक अर्हता आणि अनुभव खालील प्रमाणे असावी :-

| अ.क्र | सल्लागाराचा प्रकार | शैक्षणिक अर्हता | सल्लागार अनुभव * | वरिष्ट सल्लागार अनुभव * | प्रधान सल्लागार अनुभव * |
|---|---|---|---|---|---|
| १ | तांत्रिक व्यवस्थापन | बी.ई किवा बी.टेक (संगणक शास्त्र / माहिती तंत्रज्ञान / ईलेक्ट्रॉनिक्स) / एमसीए + एमबीए | किमान ३ वर्ष कमाल ५ वर्ष | किमान ५ वर्ष कमाल ८ वर्ष. | ८ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त |
| २ | वित्तीय व्यवस्थापन | बी.कॉम / सीए + एमबीए | किमान ३ वर्ष कमाल ५ वर्ष | किमान ५ वर्ष कमाल ८ वर्ष. | ८ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त |
| ३ | चेंज मॅनेजमेंट | कोणत्याही शाखेचा पदवीधर + एमबीए | किमान ३ वर्ष कमाल ५ वर्ष | किमान ५ वर्ष कमाल ८ वर्ष. | ८ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त |
| ४ | प्रकल्प / कार्यक्रम व्यवस्थापन | एमबीए / एम.टेक (संगणक शास्त्र/माहिती तंत्रज्ञान) | किमान ३ वर्ष कमाल ५ वर्ष | किमान ५ वर्ष कमाल ८ वर्ष. | ८ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त |

* ई-गव्हर्नन्स प्रकल्पाविषयी अनुभव अनिवार्य.

सल्लागारांचे प्रकार आणि त्यानुसार त्यांचे दर खालील प्रमाणे असतील:-

| अ.क्र. | सल्लागाराचा वर्ग | अनुभव | दर (दर माणसी दर सेवा कर व्यतिरीक्त) |
|---|---|---|---|
| १ | सल्लागार | किमान ३ वर्ष कमाल ५ वर्ष | रु.१,४०,०००/- |
| २ | वरिष्ट सल्लागार | किमान ५ वर्ष कमाल ८ वर्ष. | रु.१,९०,०००/- |
| ३ | प्रधान सल्लागार | ८ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त | रु.२,४०,०००/- |

टीप :-(१) कार्यालयीन कामासाठी सल्लागारांनी केलेला अतिरिक्त खर्च उदा. प्रवास खर्च, निवास,भोजन ई.प्रकल्पाच्या १०% च्या मर्यादेत अनुज्ञेय राहील. त्या साठी त्यांना वेळीच देयके सादर करणे आवश्यक राहील.अन्य दुस-या देयका सोबत देयके सादर केल्यास ती अदा करण्यात येणार नाहीत.

**सल्लागार संस्थेची निवड प्रक्रीया:**

1. सदर संस्था शासनाचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे (DPR), बोलीचे व्यवस्थापन (Bid Management), प्रकल्प व्यवस्थापन (Project Managment), त्रयस्थ लेखा परीक्षण, (Third Party Audit), प्रणाली / सायबर लेखा परिक्षण इत्यादी कामे करतील. विभागाला उपरोक्त सल्लागार संस्थामधून मर्यादित निविदा पध्दतीचा वापर करुन संस्थेची निवड करणे आवश्यक आहे. किंवा
2. Man-Month basis आधारीत सल्लागारांची नियुक्ती करण्यासाठी निवड झालेल्या संस्थाकडून सल्लागारांचा बायोडाटा /तांत्रिक सादरिकरण पाहून विभाग सल्लागार नियुक्तीची प्रक्रीया पार पाडेल.

उपरोक्त बाबीस विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता घ्यावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०६०११६४९३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(डॉ.संतोष भोगले)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

सर्व विधान सभा/ विधान परिषद सदस्य
मा. राज्यपाल याचे सचिव
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
महालेखाकार (लेखा व आज्ञेयत) -१/२ महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
महालेखाकार (लेखापरीक्षा) - १/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानागर पालिकांचे आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व कोषागारे
निवड नस्ती